प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (अनुसूचित जमाती उपयोजना) अंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पहिल्या हप्त्याचा दुसऱ्या भागाचा उर्वरीत केंद्र शासनाच्या हिश्श्याचा निधी रु.२२१,५७,३६,०००/- व राज्य समरुप हिस्सा रु.१४७,७१,५७,३३३/- एवढा निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रआयो-२०२५/प्र.क्र.३३/योजना-१०**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,**
**फोर्ट, मुंबई- ४०० ००१.**
**तारीख: २४ मार्च, २०२५**

वाचा :-

१) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/१/२०२४-RH-Pol.(३८९४८०) दि.१८.०२.२०२५ रोजीचे आदेश.
२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र.जा.क्र. राव्यक-ग्रागृ/लेखा (प्रआयो)/1st installment/अनु.जमाती/२०२५/६६३, दिनांक.११.०३.२०२५.
३) ग्राम विकास विभागाचा शासन निर्णय क्र.प्रआयो-२०२५/प्र.क्र.३१/योजना-१०, दिनांक २०.०२.२०२५.
४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ ३ दिनांक.१७.०३.२०२५.
५) आदिवासी विकास विभागाकडिल शासन निर्णय, क्रमांक बीयुडी-२०२४/प्र.क्र.८/कार्यासन ६ दिनांक २१.०३.२०२५.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने संदर्भीय क्र.१ येथील दिनांक १८.०२.२०२५ रोजीच्या आदेशान्वये, प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) अनुसूचित जमाती घटकांतर्गत सन २०२४-२५ या वर्षामध्ये केंद्र शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा दुसरा भाग रू.७००४६.०० लाख एवढा निधी वितरीत केला आहे. सदर निधीस रु.४६६९७.३३३ लाख एवढा राज्य समरुप हिस्सा अनुज्ञेय आहे. मात्र, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये २५०५२९९२ या लेखाशिर्षांतर्गत केंद्र हिस्सा रू.४७८८८.६४० लाख व २५०५ए१३८ या लेखाशिर्षांतर्गत राज्य हिस्सा रू.३१९२५.७६० लाख एवढा निधी उपलब्ध असल्याने, केंद्र हिस्सा रु.४७८८८.६४ लाख व राज्य हिस्सा रु.३१९२५.७६ लाख असा एकूण रु.७९८१४.४० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबतचा शासन निर्णय संदर्भ क्र.३ दि.२०.०२.२०२५ रोजी निर्गमित करण्यात आला

आहे. उर्वरीत केंद्र हिस्सा रु.२२१५७.३६ लाख तसेच राज्य हिस्सा रु.१४७७१.५७३ लाख वितरणासाठी प्रलंबित होता. मार्च, २०२५ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात पुरवणी मागणीद्ववारे मंजुर करण्यात आलेल्या तरतुदीमधून तसेच आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ दिनांक २१.०३.२०२५ च्या शासन निर्णयास अनुसरून केंद्र हिस्सा रक्कम रु. रु.२२१५७.३६ लाख व राज्य हिस्सा रक्कम रु.१४७७१.५७३ लाख अशी एकूण रक्कम रु.३६९२८.९३३ लाख इतका निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२४-२५ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. केंद्र हिश्श्याचा निधी मागणी क्र. टी-५ २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१)(०५) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य (२५०५ २९९२) व राज्य हिश्श्याचा निधी मागणी क्र. टी-५ २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१)(०६) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य (२५०५ ए१३८) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

४. प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण ही योजना केंद्र पुरस्कृत असल्याने, या शासन आदेशाद्वारे वितरीत होणारा निधी संबंधित योजनेच्या Single Nodal Agency (SNA) खात्यामध्ये वर्ग करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

६. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. अन्यथा शासन स्तरावरुन कारवाई केली जाईल.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाकडिल शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७ मार्च, २०२५ अन्वये, केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरणाबाबतच्या अटी व शर्तीनुसार तसेच विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत तसेच आदिवासी विकास विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौ.सं.क्र. ४२/का-६, दि.२०.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१४१९३९३८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANGEETA MADAN KHOLGADGE

Digitally signed by SANGEETA MADAN KHOLGADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7736f254e7550bbb9fe5a91ee61214c90d51f1a8c6f9f11ac72483ab7aa9d69d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=83DE86408C50C73CCF3F7BB3C747E6CEB249A1DDF2F026EC32694DF4BBBBD4A9, cn=SANGEETA MADAN KHOLGADGE
Date: 2025.03.24 14:29:56 +05'30'

**(सं.म.खोलगाडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)
२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, ४ था मजला, दक्षिण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
४) कोषागार अधिकारी (सहायक संचालक संवर्ग), उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर.
५) आदिवासी विकास विभाग (कार्यासन -६, ८ व १७), मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
६) वित्त विभाग (व्यय-१४ व १५) व (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई-४०० ००१.
८) निवड नस्ती योजना-१०.